**सामान्य राज्य सेवा गट-ब संवर्गातील दंतशल्य चिकित्सक (अस्थायी) यांचे शासन सेवेत सामावेशन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संआसे-२०१४/प्र.क्र. १६०/सेवा-१**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
८ वा मजला, नविन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
तारीख: : १६ ऑक्टोंबर, २०१४.

वाचा :-

**१) शासन निर्णय क्रमांकः संचालक आरोग्य सेवा यांचे पत्र क्र. संआसे/सारासे/गट-ब/कक्ष-४/अदंशचि/समावेश/१२३२/१४, दिनांक १४.२.२०१४**

प्रस्तावना :-

आरोग्य सेवा संचालनालयांतर्गत कार्यरत असलेल्या सामान्य राज्य सेवा गट-ब संवर्गातील दंतशल्य चिकित्सक हे राजपत्रित पद महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील आहे. राज्यातील रूग्णांना दंतशल्य चिकित्सक पूरविण्याची आवश्यकता लक्षात घेऊन महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून नियमित उमदेवार उपलब्ध होईपर्यंत दंतशल्य चिकित्सकांच्या नेमणूका अस्थायी स्वरूपात करण्यात आलेल्या आहेत. या दंतशल्य चिकित्सकांनी ४ ते १० वर्षे अस्थायी स्वरूपात सेवा केली असून सध्या वाढत्या मौखिक आरोग्याच्या वाढत्या समस्यांना तोंड देण्यासाठी विभागाला अनुभवी दंतशल्य चिकित्सकांची आवश्यकता विचारात घेऊन अस्थायी दंतशल्य चिकित्सकांचे समावेशन शासन सेवेत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यानुसार शासन आता खालीलप्रमाणे आदेश देत आहे.

**शासन निर्णय :-**

सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत अस्थायी स्वरूपात कार्यरत असलेल्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट "अ" मधील एकूण २१ दंतशल्य चिकित्सकांचे समावेशन शासन सेवेत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाला प्रस्ताव पाठवून आयोगाच्या मान्यतेने पुढील अटी व शर्तींनुसार करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१. सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत अस्थायी स्वरूपात कार्यरत असलेल्या २१ अस्थायी दंतशल्य चिकित्सकांचे समावेशन महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत संबंधितांची मुलाखत घेऊन करण्यात येईल.

२. मुलाखतीच्यावेळी सदर दंतशल्यचिकित्सकांचा सेवा तपशील व त्यांच्या कामगिरीचा वैयक्तिक अहवाल महाराष्ट्र लोकसेवा आयोगाला तपासणीसाठी शासनाकडून सादर करण्यात येईल.

३. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या अंतिम निर्णयानंतर विहित अटी / शर्तीस अनुसरून पात्र उमेदवारांना शासन सेवेत समावेशन करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११२४१०२३४०८८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Patil Bhaskar B

Digitally signed by Patil Bhaskar B
DN: CN = Patil Bhaskar B, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = PHD
Date: 2014.11.29 15:41:56 +05'30'

**(भा. बा. पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,
महालेखापाल, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (पत्राने).
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा.
संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
सर्व अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा संचालनालय.
सर्व सह संचालक, आरोग्य सेवा संचालनालय.
सर्व उप संचालक, सर्व मंडळे आरोग्य सेवा संचालनालय (टी.बी/बी.सी.जी., राज्य प्रयोगशाळासहीत)
सर्व कार्यक्रम प्रमुख, आरोग्य सेवा संचालनालय.
सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी
सर्व जिल्हा शल्य चिकित्सक, सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
अधिक्षक, स्त्री रुग्णालय, क्षयरोग रुग्णालय
अधिक्षक, विभागीय मनोरुग्णालये

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
सर्व उप कोषागार अधिकारी,
सामान्य प्रशासन विभाग (कक्ष-१२), मंत्रालय,मुंबई.
वित्त विभाग (सेवा-७), मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव, (सेवा-२, सेवा-३, अर्थसंकल्प शाखा), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती (सेवा-१)